

जय गजानन ५२

देवतांची ईश्वर महेश्वरांची ती दीनावस्था आणि दैन्यपूर्ण विनंती ऐकली आणि मग त्यांना आनंददायक वृतान्त वाटावा अशा रीतीने महर्षी सनत्कुमारांनी उपदेशास आरंभ केला- 'देवतांनो! मदासुर विनाशाचा एकच उपाय आहे, श्रीगणेशोपासना. तेच मदासुराचे हनन करू शकतात.'

सनत्कुमारांचे ते अत्यंत सार्थ विधान ऐकून देवता हर्षोत्फुल्ल नयन तथा हृदय झाल्या. मग त्या सगळ्यांनी त्या ऋषिवर्यांना सादर साष्टांग प्रणाम केला. भक्तिभावपूर्वक वंदन करून प्रार्थना केली. भगवन्! आपणच आता सांगावे की ही उपासना कशी करावी? उपाय सांगावा. आपण आम्हास धीर द्यावा. आराधनेची रीत समजावून सांगावी.

समस्त मुनिगणांनी तथा देवगणांनी अशा स्वरूपात प्रार्थना केल्यानंतर त्या मुनिराजांनी त्यांना एकाक्षर महामंत्राने अनुष्ठान करण्याचा सल्ला दिला. त्या आराधनेत गणेशध्यान कसे करावे ते सांगतांना म्हणतात- भगवान एकदंत, चतुर्बाहुधर आहेत. गजानन अर्थात गजमस्तकधारी आहेत. उभयांगी सिद्धि तथा बुद्धि विराजित असतात. महोदर अशी ही मूर्ती मूषकारूढ होत असते. नाभीवर शेष विलसत असतो. हाती परशू धारण केलेला असतो. अभय हस्तात कमल धारण केलेले असते. अशा त्या एकदंतांचे ध्यान करावे. तेच गणनाथ सगळ्यांच्या हृदयात निवास करत असतांत. बुद्धिप्रेरक असा हा भगवान बुद्धिपती

असून साक्षात् आत्मरूपात विलसत असतो. 'एक' हा शब्द शास्त्रकार मायेसाठी योजतात. **'अजामेकां लोहितशुक्ल कृष्णां'** अशी मायेची स्तुती केली जाते. ती एका आहे. अर्थात तीनही गुणांची एकात्मक साम्यावस्था माया असते. ती देहरूपात विलसत असते. आणि 'दंत' हा शब्द सत्ता, प्रभाव, अधिकार या अर्थाने उपयोजिला जातो. या अर्थाने 'मायेचा संचालक' रूपात वेदवादी श्रीगणनाथांची स्तुती 'एकदंत' शब्दाने करतात. भगवान श्रीगणेशच परब्रह्म आहेत. एकदंत आहेत. त्यांची सेवा करता, भक्ती करता समस्त सुखे प्राप्त होतील. अशा रीतीने देवतांना दुःखनाशाचा उपाय सांगून 'जय हेरंब एकदंत' असा उद्घोष करून सनत्कुमार आपल्या मार्गाला पावन करते झाले.

क्षणाचाही विलंबन लावता देवतांनी उपासनेच्या सिद्धीसाठी प्रयास आरंभिले. आवश्यक जुळवाजुळव केली आणि श्रीगणेशाराधनेचा संकल्प सोडण्यात आला. एकाक्षर मंत्राने भगवान श्रीएकदंतांची उपासना सुरू झाली. कोणी केवळ पाने खाऊन तप करू लागले. कोणी केवळ वारा सेवू लागले. कोणी जलप्राशन करून, कोणी निराहार तर कोणी कंदमूलफळ भक्षून आपापल्या क्षमतेनुसार तपात रत झाले. कोणी जप करीत होते. कोणी होम. कोणी पूजा तर कोणी नामस्मरण. प्रत्येकाने आपापल्या पद्धतीने शंभर वर्षेपर्यंत भगवान श्रीस्वानंदनाथाला आळवले आणि भक्तीरसाने अन्त:करणस्थ मद धुतल्या गेलेल्या त्या देवतांसमोर श्रीस्वानंदनाथ प्रगट झाले.

भगवान श्रीगजानन त्या देवतांना, मुनींना म्हणाले- मुनिवर्यांनो, देवतांनो! आपल्या आराधनेने संतुष्ट होऊन आम्ही प्रगट झालो आहोत. वरप्रदानार्थ आलो आहोत. काय हवे ते मागा. त्या दिव्य वाणीच्या श्रवणाने कृतकृत्य झालेल्या त्या देवतांनी, मुनींनी डोळे उघडले. वेदान्ताचे गुह्य, निराकाराला आपल्या समोर साकार झालेले पाहिले आणि त्यांच्या आनंदाला पारावार उरला नाही. त्या मूषकवाहनाला पाहून सर्वांनी प्रथम दण्डवत् घातला. भक्तिभावे यथाशास्त्र सर्व पूजन केले. आणि मग एकाग्रचित्ताने करसंपुट करून प्रार्थना करण्यास, स्तुतीगायनास आरंभ केला. 'हे गजवदना! हे गणेशा, अनंत, आनंदरूपा, परमभोक्ता, ब्रह्मरूपा, आदिमध्यान्तहीना तुला वंदन असो. चराचरमया, हे अनंतउदरसंस्था, शेषनाभिभूषणा तुज प्रणाम असो. हे कर्त्या, संरक्षका, संहर्त्या, त्रिगुणेश्वरा, परशुधरा, सिद्धिकांता, बुद्धीश्वरा तुज अभिवादन असो. वेदान्तगोचर भगवंता केवळ भक्तीनेच आपले हे दिव्यरूप आम्हास प्रत्यक्ष साकार स्वरूपात अनुभवता आले. आम्ही धन्य धन्य होत.

अशा रूपात अनेकवार स्तुती करून देवता, ऋषिमंडल आनंदातिरेकाने शेवटी शब्दही सुचेनासे होऊन नाचू लागले. नेत्रातून आनंदाश्रूंचे पाट वाहू लागले. अंगावर रोमांच उभे राहिले. त्यावेळी त्यांच्या अवस्थेला जाणून भगवान श्रीढुंढिराज त्यांना म्हणाले- 'देवतांनो, वरदान मागा!'

वास्तविक सर्वसाक्षी भगवंताला काय अज्ञात असते. पण भगवान साधकाला वर मागायला सांगतात. मागणाऱ्यांची योग्यता त्यातून कळत असते. भगवन्तासमोर काय मागावे ते ही कळले पाहिजे नां? समोर अनंतकोटी ब्रह्मांडनायक उभा असतांना क्षुद्र मागणी साधकाने करू नये हे त्याला समजावे, यासाठी देवता वर मागतांना म्हणतात- हे दयानिधान, आपल्या चरणकमलाचे दर्शन झाले यापेक्षा अधिक काय हवे. तथापि दैत्यांनी धर्मराज्य, देवताराज्य नष्ट केले आहे. वैदिक संस्कृतीचा नि:पात केला आहे. यज्ञयागादि पुण्य कर्मांचा विनाश केला आहे. त्यामुळे ही आसुरी रचना संपुष्टात आणण्यासाठी आम्हास अजिंक्य असणाऱ्या मदासुराचा वध करावा. हे जगन्नाथा, त्यासाठी आम्ही आपली करूणा भाकली आहे. स्थानभ्रष्ट देवता आणि कर्मभ्रष्ट ऋषिमुनींना पुनरपि स्ववैभव प्रदान करावे आणि मनात अचल भक्ती प्रदान करावी यासाठी आम्ही आपली आराधना केली आहे.

भगवान प्रसन्न झाले. देवतांनी केलेल्या त्या स्तुतीला अनेक वरदाने देण्यात आली. जो ही स्तुती वापरून आमची आराधना करेल त्याला काय वाट्टेल ते आम्ही प्रदान करू, असे अभिवचन देऊन दैत्यविनाशार्थ 'तथाऽस्तु' चा घोष करीत भगवान अन्तर्धान पावले.

त्यानंतर देवतांनी भारतभूमीच्या आग्नेयेला विघ्नगणेश क्षेत्रावर भगवान श्रीएकदंताची श्रीमूर्ती सुस्थापित केली. त्या स्थानात समस्त देवताही अंशरूपात निवास करू लागल्या. तेथूनच त्यांना सिद्धी प्राप्त झाली. अत: परम सिद्धिप्रद असे हे क्षेत्र साधकांसाठी अतीव पूजनीय ठरते. त्याचे वर्णन शेकडो वर्षे केले तरी अपूर्णच आहे असे म्हणत दैत्यराज प्रल्हादाला कथाभाग सांगतांना गृत्समदांनी एकदंत प्रगटीकरणाचा कथाभाग वर्णिला.

(आज हे एकदंत स्थान केरळ प्रान्तात श्रीआद्यशंकराचार्यांचे जन्मस्थान पुण्यभूमी कालडीच्या जवळ विद्यमान आहे. श्रीएकदंतांचे देवतांना प्रथम दर्शन त्या स्थानी झाले.)



